# महाराष्ट्र विधानपरिषद

## दुसरे (पावसाळी) अधिवेशन, २०१८

---

### अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### फ्लीट टॅक्सी व वेब टॅक्सी सेवांच्या नियमांची कडक अंमलबजावणी करण्याबाबत

**(१) ५८५४ (१६-०४-२०१५). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) प्रवाशांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून सर्व वातानुकूलीत टॅक्सी, स्लीपर कोच, टुरिस्ट टॅक्सी इत्यादी कंत्राटी व भाड्याच्या वाहनांसाठी राज्य परिवहन विभागाने दिनांक १ जानेवारी, २०१५ पासून कडक नियम लागू केले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर नियमांचे स्वरुप काय आहे,

(३) सदर नियमांच्या अंमलबजावणीसाठी कोणती उपाययोजना करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१२-०२-२०१८) :** (१) दिल्ली येथे टॅक्सीमध्ये महिला प्रवाशांसोबत अत्याचार झाल्याच्या घटनेच्या पार्श्वभूमीवर फ्लीट टॅक्सी व वेब टॅक्सी सेवांच्या बाबतीत नियमांची कडक अंमलबजावणी करण्याबाबत सूचना जारी करण्यात आल्या आहेत.

(२) फ्लीट व वेब टॅक्सी कंपन्याच्या प्रतिनिधींच्या बैठका आयोजित करून त्यांना खालीलप्रमाणे निर्देश देण्यात आले व त्याच्या कार्यपूर्तीचा आढावा घेण्यात आला.

अ) वाहनचालकांसाठी सार्वजनिक प्रवासी वाहतूकीचा बिल्ला (बॅज) बंधनकारक असणे.

ब) या टॅक्सी कंपन्यांकडील चालकांच्या चारित्र्याची पोलीस विभागाकडून पडताळणी करणे.

क) मोबाईल ॲप्लीकेशन तसेच टॅक्सीमध्ये पॅनिक बटण सुविधा निर्माण करणे.

ड) पुरेशा मनुष्यबळासह नियंत्रण कक्ष स्थापन करणे.

इ) पोलीस व आपात्कालीन संपर्क क्रमांक टॅक्सीमध्ये प्रदर्शित करणे.

ई) वाहन चालकांच्या कागदपत्रांची प्रादेशिक परिवहन कार्यालयामार्फत पडताळणी करणे.

उ) वाहन व चालकाची माहिती पोलीस व परिवहन विभागाला देणे.

(३) फ्लीट व वेब बेस्ड टॅक्सींची विशेष तपासणी मोहिम मुंबई महानगर क्षेत्रात राबविण्यात आली. सदर मोहिमेदरम्यान एकूण ४३३८ टॅक्सींची तपासणी करून ११६० टॅक्सींविरुध्द केलेल्या कारवाईतून रुपये १६,५४,०१३/- इतकी दंडवसुली करण्यात आली.

दिनांक ४/०३/२०१७ च्या अधिसूचनेन्वये “महाराष्ट्र सिटी टॅक्सी सेवा नियम, २०१७” राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

**बीड जिल्ह्यातील कर्जदार शेतकऱ्यांना डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ देण्याबाबत**

**(२) १०२४७ (२९-०७-२०१५). श्री.अमरसिंह पंडित, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग, श्री.सतिश चव्हाण, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड जिल्ह्यातील कर्जदार शेतकऱ्यांनी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ मिळत नसल्याबाबत तक्रारी जिल्हा अग्रणी बँक, जिल्हाधिकारी आणि जिल्हा उपनिबंधक यांच्याकडे शेतकऱ्यांनी केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लोकप्रतिनिधींनी याबाबत दिनांक ८ जून, २०१५ व त्यानंतर अनेकवेळा स्मरणपत्राद्वारे जिल्हा अग्रणी बँक, जिल्हाधिकारी आणि जिल्हा उपनिबंधक यांच्याकडे याबाबत मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, बीड जिल्ह्यातील रुपये १ लाखापेक्षा कमी रक्कमेच्या नियमित परतफेड करणाऱ्या कर्जदार शेतकऱ्यांना या योजनेचा लाभ देणेबाबत शासन कोणती कार्यवाही केली आहे वा करण्यात येत आहे,

(४) योजनेचा लाभ मिळत नसल्याबाबत वारंवार होणाऱ्या तक्रारीबाबत शासन ठोस उपाययोजना करणार आहे काय,

(५) शेतकऱ्यांना योजनेचा लाभ न देणाऱ्या बँकाविरोधात शासन कोणती कार्यवाही करणार आहे ?

**श्री.सुभाष देशमुख (१६-०४-२०१८) :** (१) होय.

मा.श्री.अमरसिंह पंडित, वि.प.स. यांनी दिनांक ०८/०६/२०१५ रोजी जिल्हा अग्रणी बँक, बीड यांच्याकडे महाराष्ट्र ग्रामीण बँक शाखा, तेलगाव बाबतची तक्रार दिली होती. त्याची एक प्रत जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बीड या कार्यालयास प्राप्त झाली आहे.

(२) होय.

उपरोक्त निवेदनाची प्रत दिनांक १५/०६/२०१५ रोजी क्षेत्रिय व्यवस्थापक, महाराष्ट्र ग्रामीण बँक, बीड यांच्याकडे चौकशीसाठी पाठविण्यात आली होती. त्या अनुषंगाने निवेदनात उल्लेख केलेल्या संबंधित कर्जदारांनी

वेळोवेळी बँकेकडे मुद्दल भरणा केलेली आहे. तसेच बँकेने त्यांच्या कर्जावर व्याज आकारणी केलेली नाही. संबंधितांना बँकेने सन २०१४-१५ पर्यंतच्या डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ दिलेला आहे.
(३) रुपये १.०० लाखापेक्षा कमी व रुपये १.०० ते ३.०० लाखापर्यंतचे नियमित पीक कर्ज परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना नियमाप्रमाणे सदर योजनेचा लाभ देण्यात येतो.

सन २०१५-१६ पर्यंत रुपये २१४९.४८ लाखांचे वितरण केले असून १,९९,६१८ लाभार्थी शेतकऱ्यांना याबाबत लाभ देण्यात आला आहे.
(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात नियमबाह्य फॅन्सी नंबरप्लेट लावलेल्या वाहनधारकांवर कारवाई करण्याबाबत

**(३) १२९०३ (२१-१२-२०१५). श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात नियमबाह्य दादा, काका, मामा या पध्दतीने फॅन्सी नंबरप्लेटच्या वाहनांवर कारवाई करण्याचा निर्णय परिवहन विभागाने घेतल्याचे दिनांक २ ऑगस्ट, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अपघाताच्या वेळी फॅन्सी नंबरप्लेटमुळे वाहन क्रमांक पीडीतांना घेता येत नसल्याने तपासकार्यात पोलिसांना अडथळा निर्माण होत असून याबाबत परिवहन विभागाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, फॅन्सी नंबरप्लेटबाबत घेतलेल्या निर्णयानुसार राज्यात आतापर्यंत किती जणांवर कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१२-०२-२०१८) :** (१), (२) व (३) केंद्रीय मोटार वाहन नियम, १९८९ च्या ५० व ५१ मध्ये वाहनांवर नोंदणी क्रमांक विहीत पध्दतीने प्रदर्शित करण्यासंदर्भात तरतूद विहीत केली आहे. सदर तरतूदीनुसार वाहनावर नोंदणी क्रमांक लिहिण्यात आला नसेल तर चालक/ मालकाविरुध्द मोटार वाहन कायदा,१९८८ च्या कलम १७७ मधील तरतूदीनुसार दंडात्मक कारवाई करण्यात येते. त्यानुसार एप्रिल ते डिसेंबर, २०१५ या कालावधीत राज्यभरात एकूण ९२९६ इतक्या दोषी वाहनांवर दंडात्मक कारवाई करण्यात आली असून रुपये ११,२९,१००/- एवढे तडजोड शुल्क वसूल करण्यात आले.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## "मागेल त्याला शेततळे" या योजनेसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(४) १९४१७ (११-०८-२०१६). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर, श्री.रामराव वडकुते, श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक १५९३९ ला दिनांक १८ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शासनामार्फत मागेल त्या शेतकऱ्यांस शेततळे देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे मात्र सदर शेततळ्यासाठी केवळ ५० हजार रुपयांचे अनुदान देण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, “मागेल त्याला शेततळे” या योजनेसाठी राज्यातून ३० एप्रिलअखेर सुमारे १ लाख ३७ हजार २३६ इतके अर्ज प्राप्त झाले आहेत, प्राप्त अर्जापैकी सुमारे २४ हजार ५१७ अर्ज मंजूर करण्यात आले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच सदर योजनेंतर्गत शेततळे निवडीच्या जागेबाबत नियम डावलून शेततळयांचे वाटप करण्यात येत असल्याचे माहे मे, २०१६ च्या पहिल्या सप्ताहात निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, प्रश्नोक्त बाब (१) व (३) बाबत चौकशी करुन चौकशीच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१९-०३-२०१८) :** (१) व (२) होय.
(३) नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद विभागातील आठ जिल्हयात महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेची कामे नियोजनानुसार होत नसल्याबाबत

**(५) २०३७६ (२०-०८-२०१६). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठवाड्यातील आठ जिल्हयांमध्ये महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेंतर्गत शासकीय यंत्रणेने निश्चित केलेली कामे १ लाख १० हजार ३४ इतकी असली तरी माहे एप्रिल, २०१६ अखेर या योजनेंतर्गत प्रत्यक्ष ६ हजार ७४४ इतकीच कामे सुरु होती व तफावतीमुळे योजनेतील कामे नियोजनानुसार होत नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१२-०३-२०१८) :** (१) औरंगाबाद विभागातील आठ जिल्हयात महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेची माहे एप्रिल, २०१६ अखेर ११०८७९ कामे शेल्फवर उपलब्ध करण्यात आली होती. त्यापैकी १०४५६ कामे चालु होती व त्यावर १७१५४५ मजुरांची उपस्थिती होती. शासन निर्णयानुसार मजूरांच्या मागणीप्रमाणे कामे उपलब्ध करुन देण्याकरीता मोठ्या प्रमाणावर शेल्फवर उपलब्ध करण्यात आली होती.

(२) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना ही मजूरांच्या काम मागणीवर आधारित योजना आहे. मजूरांच्या कामाच्या मागणीनुसार कामे उपलब्ध करुन देण्यात आल्यामुळे चौकशी करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात अतिरिक्त ठरलेल्या शिक्षकांच्या समायोजनाबाबत**

**(६) २११२३ (२३-०८-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर, श्री.रामराव वडकुते, श्री.प्रकाश गजभिये, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सन २०१५-१६ च्या संच मान्यतेनंतर अतिरिक्त ठरलेल्या मुख्याध्यापक, उपमुख्याध्यापक पर्यवेक्षक व शिक्षकांच्या पदांची जिल्हानिहाय संख्या किती आहे,
(२) असल्यास, अतिरिक्त ठरलेल्या मुख्याध्यापक, उपमुख्याध्यापक, पर्यवेक्षक व शिक्षकांच्या समायोजनाबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-०२-२०१८) :** (१) शासन निर्णय ०२/०७/२०१६ अन्वये मुख्याध्यापक, उपमुख्याध्यापक व पर्यवेक्षक यांना संरक्षण देण्यात आलेले आहे. एकूण ५६५३ माध्यमिक शिक्षक अतिरिक्त ठरले आहेत.

सन २०१५-१६ च्या संच मान्यतेनुसार माध्यमिक शाळांतील जिल्हानिहाय अतिरिक्त ठरलेल्या शिक्षकांची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | विभाग | जिल्हा | अतिरिक्त झालेले शिक्षक संख्या | जिल्हा स्तरावर ऑनलाईन समायोजन झालेली शिक्षक संख्या | शि अ यांच्या अहवालानुसार प्रत्यक्ष रुजू झालेली शिक्षक संख्या |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | **मुंबई** | बुहन्मुंबई | ६०० | १११ | ८६ |
| | | ठाणे | १७७ | १३९ | ८३ |
| | | रायगड | १६८ | ३७ | १६ |
| | | पालघर | ४ | ३ | ३ |
| | **मुंबई विभाग एकूण** | | **९४९** | **२९०** | **१८८** |
| २ | **नाशिक** | नाशिक | ११९ | ४३ | ३६ |
| | | धुळे | १३४ | ८६ | ४६ |
| | | नंदुरबार | ७७ | १६ | ० |
| | | जळगाव | १४४ | ८० | ६५ |
| | **नाशिक विभाग एकूण** | | **४७४** | **२२५** | **१४७** |
| ३ | **पुणे** | पुणे | २७६ | १७१ | ८४ |
| | | अहमदनगर | ५७ | ५६ | ४८ |
| | | सोलापूर | १९७ | ९३ | १५ |
| | **पुणे विभाग एकूण** | | **५३०** | **३२०** | **१४७** |
| ४ | **कोल्हापूर** | कोल्हापूर | २४८ | १६५ | ४५ |
| | | सातारा | १०९ | ८६ | ६४ |
| | | सांगली | ११४ | १०२ | ९० |
| | | रत्नागिरी | ८७ | ६४ | ३९ |
| | | सिंधुदुर्ग | ११७ | ० | ० |
| | **कोल्हापूर विभाग एकूण** | | **६७५** | **४१७** | **२३८** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ | **औरंगाबाद** | औरंगाबाद | १३८ | ५० | १३ |
| | | जालना | ४६ | ७ | ३ |
| | | बीड | १६२ | ६८ | ८ |
| | | परभणी | १५ | १२ | १२ |
| | | हिंगोली | ३० | ११ | ८ |
| | **औरंगाबाद विभाग एकूण** | | **३९१** | **१४८** | **४४** |
| ६ | **लातूर** | लातूर | १९१ | ७३ | ६ |
| | | नांदेड | १८९ | ७७ | ३१ |
| | | उस्मानाबाद | ८३ | ३२ | १७ |
| | **लातूर विभाग एकूण** | | **४६३** | **१८२** | **५४** |
| ७ | **नागपूर** | नागपूर | ६९१ | ११९ | ६७ |
| | | भंडारा | ११३ | ३७ | २९ |
| | | गोंदिया | १११ | ३२ | २१ |
| | | चंद्रपूर | २५२ | ४६ | २५ |
| | | गडचिरोली | १४२ | १७ | ६ |
| | | वर्धा | १९६ | ५४ | ४१ |
| | **नागपूर विभाग एकूण** | | **१५०५** | **३०५** | **१८९** |
| ८ | **अमरावती** | अमरावती | २३२ | १२४ | १०९ |
| | | अकोला | १२० | ५९ | ४८ |
| | | वाशिम | ६७ | २६ | १४ |
| | | बुलढाणा | १२२ | ६९ | ५६ |
| | | यवतमाळ | १२५ | १२४ | ६२ |
| | **अमरावती विभाग एकूण** | | **६६६** | **४०२** | **२८९** |
| | **राज्य एकुण** | | **५६५३** | **२२८९** | **१२९६** |

(२) शासन निर्णय दिनांक ०२/०७/२०१६ मधील तरतुदीनुसार सुधारित निकषानुसार अतिरिक्त ठरत असल्यास त्यांना त्यांच्या कार्यरत ठिकाणी सेवा निवृत्त होईपर्यंत कायम ठेवावे अशी तरतूद असल्याने समायोजन करण्यात आलेले नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे नेरी (ता.जामनेर, जि.जळगांव) येथे महिला सरपंचास ध्वजारोहण करण्यात मनाई केल्याबाबत

**(७) २१८२३ (२०-०८-२०१६). अॅड.जयदेव गायकवाड :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे नेरी (ता.जामनेर, जि.जळगांव) येथील जिल्हा परिषद प्राथमिक शाळेमध्ये महाराष्ट्र दिन दिनांक १ मे, २०१६ रोजी मागासवर्गीय महिला सरपंचाना ध्वजारोहण करण्यास शालेय व्यवस्थापन समितीने प्रतिबंध केला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात सदर महिला सरपंचाने जिल्हाधिकारी यांच्याकडे तक्रार केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुसार संबंधितांविरुध्द कोणती कारवाई करण्यात आली,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०३-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) प्रस्तुत प्रकरणी नियुक्त केलेल्या चौकशी समितीच्या अहवालानुसार, शासन परिपत्रक दिनांक १२/०८/२००५ रोजीच्या तरतुदीन्वये राज्यातील शाळांमधून संबंधित शाळेचे मुख्याध्यापक यांच्या हस्ते ध्वजारोहण करण्यात यावे, अशा सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार, सदर सूचनांचे पालन करण्यात तत्कालीन मुख्याध्यापकाने कसुर केले किंवा कसे याबाबत विभागीय चौकशी करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ग्रँटरोड (मुंबई) येथील ब्राम्हणवाडीतील शितल इस्टेटच्या चाळींच्या पुनर्विकासातील गैरव्यवहाराबाबत

**(८) २२०२७ (२४-०८-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ग्रँटरोड (मुंबई) येथील ब्राम्हणवाडीतील शितल इस्टेटच्या ९ चाळींच्या पुनर्विकासासाठी दिनांक १८ जून, २०१२ रोजी वा त्यासुमारास नियम डावलुन ना-हरकत प्रमाणपत्र देणाऱ्या मुंबई इमारत दुरुस्ती आणि पुनर्रचना मंडळाच्या अधिकारी आणि अभियंत्यांची लाचलुचपत प्रतिबंधक विभागामार्फत सुरु असलेली चौकशी पूर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार ना-हरकत प्रमाणपत्र देण्यास जबाबदार असणाऱ्या मुंबई इमारत दुरुस्ती आणि पुनर्रचना मंडळाचे अधिकारी, कर्मचारी व अभियंता यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०४-२०१८) :** (१), (२) व (३) या प्रकरणी लाचलुचपत प्रतिबंधक विभागानी दिनांक १८ जुलै, २०१६ रोजी उघड चौकशी सुरू केली आहे. तसेच २० फेब्रुवारी, २०१७ च्या शासन पत्राद्वारे सदर चौकशी लवकर पूर्ण करून अहवाल सादर करण्याचे निर्देश लाचलुचपत प्रतिबंधक विभागास देण्यात आले आहे.

---

## आदिवासी विभागांतर्गत महाविद्यालयातील शिक्षकांना अतिरिक्त ग्रेड पे देण्याबाबत

**(९) २३२२८ (१६-०८-२०१६). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सन १९९९ पासून आदिवासी विभागांतर्गत सुरु असलेली कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक या पदाची आदिवासी विभागाच्या दिनांक

३ मे, २००० च्या शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली असून व नियमित पदस्थापना सन २००१ पासून देण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक आदिवासी दुर्गम डोंगराळ भागातील विद्यार्थ्यांना मागील १५ वर्षापासून विद्यादानाचे अविरत कार्य करीत असून त्यांना अद्यापपर्यंत अतिरिक्त ग्रेड पे देण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासन निर्णयानुसार १२ वर्षानंतर निवड श्रेणी लागू करुन अतिरिक्त ग्रेड पे देण्याचे धोरण असताना सदर मागण्या पूर्ण करण्याबाबत आदिवासी विभागाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२३-०३-२०१८) :** (१) शासन निर्णय, दिनांक ३ मे, २००० अन्वये आदिवासी उपयोजना क्षेत्रात कनिष्ठ महाविद्यालय सुरु केलेल्या ३० शासकीय माध्यमिक आश्रमशाळेत नैसर्गिक वर्गवाढीनुसार इयत्ता १२ वी चे (कला किंवा कला व विज्ञान शाखा) वर्ग सुरु करण्यास, तसेच आवश्यक शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी वर्गाची निर्मिती करण्यास मंजूरी देण्यात आली आहे हे खरे आहे.

(२) व (३) कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षकांना दिनांक ०५/०७/२०१० च्या शासन निर्णयान्वये सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या पहिल्या व दुसऱ्या लाभांतर्गत अतिरिक्त ग्रेड वेतन मंजूर करण्यात आले आहे. १२ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांना वरिष्ठ श्रेणी लाभ देण्यात आलेला आहे. सद्य:स्थितीत कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षक

२४ वर्षाचा कार्यकाळ पूर्ण करत नसल्याने निवडश्रेणीचा लाभ देण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## निजामपूर (ता.साक्री, जि.धुळे) येथील नकटा बंधाऱ्यांसाठी निधीची तरतूद करण्याबाबत

**(१०) २४६७४ (१६-१२-२०१६). श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मृद व जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) निजामपूर (ता.साक्री, जि.धुळे) येथील नकटा बंधाऱ्यांची उंची वाढवून दुरुस्ती करण्याबाबत नागरिकांची मागणी असूनही शासनाचे याकडे दुर्लक्ष होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी करुन बंधाऱ्यांच्या दुरुस्तीसाठी निधीची तरतूद करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०७-०४-२०१८) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

सदर पाझर तलावाची उंची वाढविणेबाबत ग्रामपंचायत जैताणे ता.साक्री यांनी दिनांक ०८/०९/२०१५ रोजी कार्यकारी अभियंता, लघुसिंचन विभाग, जिल्हा परिषद, धुळे या कार्यालयाकडे मागणी केली होती.

(२) व (३) साक्री तालुक्यातील पाझर तलाव (नकटा बंधारा) च्या पाहणीनुसार, सदर पाझर तलाव हा पाण्याने परिपूर्ण भरलेला आहे. तसेच सदर तलावाच्या वरील बाजुस इतर विभागांमार्फत म्हसाईमाता पाझर तलाव, साती सैयद पाझर तलाव व कायडू पाझर तलाव अशी एकुण ०३ पाझर तलावांची कामे झाली आहेत. त्यामुळे ३० ते ३५ हेक्टर सिंचन क्षेत्रात वाढ होवून, पाण्याची आवक शिल्लक नाही. सदर पाझर तलावाच्या उजव्या बाजुचा काठ हा धरण माथ्याच्या उंची इतकाच असल्यामुळे, पाझर तलावाची उंची वाढविण्यास वाव नाही. तसेच नकटा बंधारा या पाझर तलावाची उंची वाढविल्यास त्यामध्ये काही शेतकऱ्यांची जमीन पाण्याखाली जाणार आहे, सबब संबंधित शेतकऱ्यांनी व त्यांच्या वारसांनी जमीन देण्यास नकार दर्शविला आहे.

उपरोक्त सर्व तांत्रिक बाबी व वस्तुस्थिती विचारात घेता प्रश्नांकित पाझर तलावाची उंची वाढविणे शक्य नाही. म्हणजेच नकटा बंधाऱ्याच्या दुरूस्तीची आवश्यकता नाही, सबब निधीची मागणी वा निधीची तरतूद करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील गावांतील शाळांमध्ये क्रीडांगणे नसल्याबाबत**

**(११) २५३७२ (१६-१२-२०१६). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील गावांतील शाळांमध्ये क्रिडांगण नसल्यामुळे विद्यार्थ्यांना खेळापासून वंचित राहावे लागत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाने मैदानांचा प्रश्न मार्गी लावण्यासाठी प्रयत्न करावे अशी मागणी स्थानिक नागरिक तसेच विद्यार्थ्यांकडून होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील गावांगावामध्ये क्रीडांगणे बनविण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२१-०४-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

(३) ज्या शाळांमध्ये क्रीडांगण उपलब्ध नाही अशा शाळांकरीता, शाळा व्यवस्थापन समितीने शाळेच्या आसपास असलेल्या परिसरामध्ये बालकांना खेळण्यासाठी संबंधितांकडून ना हरकत प्रमाणपत्र घेऊन तात्पुरत्या स्वरुपात क्रीडांगण उपलब्ध करणेबाबत शासन निर्णय, दिनांक २९/०३/२०१३ अन्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शिक्षणाधिकारी माध्यमिक (जि.सोलापूर) यांच्याकडे शिक्षकांच्या प्रलंबित प्रकरणी कार्यवाही करण्याबाबत

**(१२) २६८८१ (१२-०४-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिक्षणाधिकारी माध्यमिक (जि.सोलापूर) यांच्याकडे शिक्षकांच्या प्रलंबित असलेल्या अनेक प्रकरणी लोकप्रतिनिधी यांनी ईमेलद्वारे निवेदने दिली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दिनांक १५ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या शासन आदेशानुसार सदर कार्यालयाने कार्यवाही केली आहे काय,

(३) असल्यास, उक्त निवेदनाबाबत शिक्षणाधिकारी माध्यमिक यांची भूमिका काय आहे व याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०४-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) शासन परिपत्रक दिनांक १५/११/२०१६ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार मा.लोकप्रतिनिधी यांचेकडून प्राप्त झालेल्या पत्रव्यवहारावर कार्यवाही करण्याची दक्षता शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जि.प. सोलापूर घेत असल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## चिंचवाडी ते माथेरान (ता.कर्जत, जि.रायगड) रस्त्याच्या कामाबाबत

**(१३) २८०५७ (१७-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चिंचवाडी ते माथेरान (ता.कर्जत, जि.रायगड) हा रस्ता वनजमिनीतून तसेच इको सेंन्सीटीव झोन मधून जात आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर रस्त्याच्या कामाकरीता सन १९८५ मध्ये वा त्यादरम्यान सार्वजनिक बांधकाम विभागाने सर्व्हेक्षण करुन आपला अहवाल शासनाकडे सादर केला होता, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर अहवालानुसार शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-०४-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे. चिंचवाडी (धोदाणी) माथेरान अशा प्रकारचा रस्ता अस्तित्वात नसून, ही डोंगर भागातील तीव्र चढ उताराची वन जमिनीतून जाणारी पायवाट आहे.
(२) हे खरे नाही. सन १९८५ अथवा त्यादरम्यान सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत या रस्त्याच्या कामाकरीता सर्व्हेक्षण झाल्याबाबतचा अहवाल उपलब्ध नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

### यवतमाळ जिल्ह्यातील विहिरींच्या दुरुस्तीची कामे पूर्ण करण्याबाबत

**(१४) २८४५९ (१५-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.रामराव वडकुते, श्री.अनिल भोसले, श्री.प्रकाश गजभिये, श्री.आनंद ठाकूर, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्ह्यात सन २०१२-२०१३ या वर्षात अतिवृष्टीमुळे खचलेल्या व बुजलेल्या विहिरींची दुरुस्तीची कामे शासनाच्या मंजूरी अभावी पूर्ण नाहीत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सन २०१२-२०१३ या वर्षात अतिवृष्टीने खचलेल्या व बुजलेल्या विहिरीची कामे करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२३-०२-२०१८)** : (१) व (२) हे खरे नाही.

शासन पत्र दिनांक १३ सप्टेंबर, २०१७ च्या पत्रान्वये एक विशेष बाब म्हणून यवतमाळ जिल्ह्यातील सन २०१२-१३ मध्ये अतिवृष्टीमुळे खचलेल्या विहिरींची दुरुस्तीची कामे मग्रारोहयोअंतर्गत पूर्ण करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राष्ट्रीय रोजगार हमी योजनेच्या लाभार्थ्यांची प्रलंबित रक्कम देण्याबाबत**

**(१५) २८४६१ (१५-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणीसाठी माहे सप्टेंबर, २०१६ च्या पहिल्या आठवड्यात राज्य शासनाने केंद्र शासनाकडे दहा हजार कोटी रुपयांची मागणी केलेली असून त्यापैकी पहिल्या टप्प्यात ३१० कोटी रुपयांचा निधी राज्य शासनास प्राप्त झालेला आहे, हे खरे आहे काय,
(२) तसेच राज्यातील राष्ट्रीय रोजगार हमी योजनेच्या लाभार्थ्यांना सन २०१३-१४ व २०१६-१७ मधील विलंबापोटी नुकसान भरपाईच्या स्वरुपात मिळणारे १३०० कोटी थकीत असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर निधीतून कोणती कामे निकषानुसार करण्यात आलेली आहेत,

(४) असल्यास, केंद्र शासनाकडे थकीत असलेली रक्कम मिळावी म्हणून शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१९-०३-२०१८) :** (१) राज्य शासनाने दिनांक १६ जुलै, २०१६ रोजी केंद्र शासनास निधी मागणी प्रस्ताव मागील प्राप्त निधीच्या उपयोगिता प्रमाणपत्रासह सादर केला आहे. त्यावर केंद्र शासनाने घेतलेल्या आक्षेपांची पूर्तता करुन पुन्हा दिनांक ०३ सप्टेंबर, २०१६ ला प्रस्ताव केंद्र शासनास सादर केला. दिनांक ०७ सप्टेंबर, २०१६ ला केंद्र शासनाने रुपये ३१०९८.५७ लक्ष इतका निधी राज्य शासनास मंजूर केला.
(२) व (३) हे खरे नाही.
(४) विलंब नुकसान भरपाईचे दायित्व केंद्र शासनाचे नसून राज्य शासनाचे आहे. करीता केंद्र शासनाकडे विलंब नुकसान भरपाईची कुठलीही रक्कम थकित नाही.
(५) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## राज्य/राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षकांना वेतनवाढ देण्याबाबत

**(१६) २९५९० (१२-०४-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सन २००६-२००७ व २००८ या वर्षात ज्या शिक्षकांनी चांगली व उत्कृष्ट कामे केली आहेत त्यांना आदर्श शिक्षक पुरस्कार देण्यात आला असून वेतनवाढ देण्यात आली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शिक्षकांना दोन वेतनवाढी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०४-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही. सन २००५-०६ ते सन २०१२-१३ या कालावधीमधील राज्य/राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षकांना शासन निर्णय दिनांक २५/०१/२०१७ अन्वये दोन आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गाजीपुर (ता.दारव्हा, जि.यवतमाळ) येथे स्मशानभूमीकरीता जागा उपलब्ध करून देण्याबाबत

**(१७) ३०६५३ (१७-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गाजीपुर (ता.दारव्हा, जि.यवतमाळ) येथे अंत्यसंस्कारासाठी जागा नसल्याने विविध अडचणींना सामोरे जावे लागणे तसेच स्मशानभूमी व टीन शेडकरीता जागा उपलब्ध करुन देणेबाबतचे निवेदन गावकऱ्यांनी उपविभागीय अधिकाऱ्यांना दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निवेदनावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०५-०३-२०१८) :** (१) होय.
(२) गाजीपुर (ता.दारव्हा, जि.यवतमाळ) येथील गावकऱ्यांनी दिलेल्या निवेदनानुसार उपविभागीय अधिकारी दारव्हा यांचे आदेशानुसार स्मशानभूमीसाठी जमीन राखून ठेवण्यात आलेली असून भूसंपादनाची कार्यवाही करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ग्रामसेवकांच्या प्रलंबित मागण्यांबाबत

**(१८) ३०७६४ (१७-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ग्रामसेवक संवर्गाच्या प्रलंबित मागण्या सोडविण्यासाठी ग्रामसेवक युनियनने शासनाकडे दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ग्रामसेवक संवर्गाच्या मागण्या कोणकोणत्या आहेत, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन मागण्या पूर्ण करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२६-०२-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) ग्रामसेवकाच्या प्रलंबित मागण्या खालीलप्रमाणे आहेत :-

१) कंत्राटी ग्रामसेवकांची ३ वर्षे कंत्राटीसेवा काळ नियमित करण्याबाबत तातडीने निर्णय घेणे.

२) अ) सोलापूर जिल्ह्यातील २३९ ग्रामसेवकांवरील चुकीची कार्यवाही रद्द करणे व ३९ निलंबित ग्रामसेवकांना सेवेत पुर्नस्थापित करणे.

ब) ठाणे जि.प. मार्फत ग्रामसेवकांकडील चुकीची कार्यवाही रद्द करणे.

क) वर्धा जिल्ह्यातील ग्रामसेवकांवर झालेल्या चुकीच्या फैाजदारी केसेस मागे घेणे.

३) ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांना दरमहा प्रवास भत्ता पगाराबरोबर रुपये ३०००/- करण्याबाबत.

४) ग्रामसेवक संवर्गाच्या शैक्षणिक अर्हतेत बदल करणे.(इ.१२ वी ऐवजी पदवीधर करणे)

५) सन २०११ चे लोकसंख्येवर आधारीत राज्यभर ग्रामविकास अधिकारी सजे व पदे निर्मिती करणेबाबत.

६) ग्रामसभेची संख्या मर्यादीत असावी व इतर यंत्रणा ग्रामसभा सचिव बदल होणे व ग्रामसभा सुधारणा होणे.

७) नरेगा करीता स्वतंत्र यंत्रणा व्हावी (युनियन प्रस्ताव कामाचे वाटप होणे कुशल पेमेंट बाबत निर्णय होणे).
८) ग्रामसेवक संवर्गाकरीता वैद्यकीय कॅशलेस सुविधा मिळणे.
९) राज्यस्तर आदर्श ग्रामसेवक पुरस्कार वितरण सोहळा होणेबाबत.
१०) १२ जून, २०१३ चे विना चौकशी फौजदारी केसेस परिपत्रक मागे घेणे.
११) विस्तार अधिकारी २० ग्रा.पं करीता पदनिर्मीती होणे, समाज कल्याण विस्तार अधिकारी पदे भरणे, केंद्र पुरस्कृत विस्तार अधिकारी पद निर्मिती होणे.
१२) सन २००५ नंतर सेवेत ग्रामसेवकांना जुनी पेन्शन योजना लागू होणे व डीसीपीएस हिशोब स्लिपा सर्वांना जि.प मार्फत मिळणे
१३) ग्रामसेवक संवर्गाचा सुधारीत जॉब चार्ट तयार होणे.
१४) राज्यात निलंबित ग्रामसेवकांना प्रधान्य क्रमाने पुर्नस्थापित करणेबाबत कालबध्द कार्यक्रम होणेबाबत.
१५) राज्यभर होणारे ग्रामसेवक हल्ले, मारहाण, खोटया केसेस याबाबत सेवा संरक्षण व सरकारी कर्मचारी मारहाण गुन्हा अजामिनपात्र करणेस्तव निर्णय होणे.

ग्रामसेवकांच्या वरील मागण्यांवर केलेली कार्यवाही :-

**मागणी क्रमांक :-** १ नुसार ३ वर्षाचा व्यतित केलेला कंत्राटी कालावधी हा कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राहय धरण्यास मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव मंजूरीसाठी मा.मुख्यमंत्री महोदयांकडे पाठविण्यात आलेला आहे. तद्नंतर अंतिम मान्यतेसाठी मंत्रिमंडळासमोर ठेवण्यात येणार आहे.

**मागणी क्रमांक :-** १३ ग्रामसेवकांचा सुधारित जॉब चार्ट तयार करुन तो दिनांक ०३ डिसेंबर, २०१६ च्या परिपत्रकांन्वये निर्गमित करण्यात आलेला आहे.

उर्वरित मागण्यांवर निर्णय घेण्याकरीता शासनातर्फे सकारात्मक विचार सुरु आहे.

---

## राज्यात धर्मांतराच्या संख्येत वाढ होत असल्याबाबत

**(१९) ३०९६८ (१९-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात दररोज किमान दोन व्यक्ती आपला धर्म बदलून धर्मांतर करत असल्याने धर्मांतर करणाऱ्यांच्या संख्येत सन २०१४ ते २०१६ या कालावधीत तिप्पटीने वाढ झाल्याची माहिती एका सामाजिक कार्यकर्त्यास माहितीच्या अधिकारामध्ये शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशने संचालनालयाने माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर धर्मांतरे जबरदस्तीने, दबावाने वा इतर कोणत्या कारणाने करण्यात आली याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (२१-०४-२०१८) :** (१) होय.

(२) सदर धर्म बदलण्याची जाहिरातीसाठी प्राप्त अर्जात विवाह, स्वेच्छेने अशी विविध कारणे दर्शविली आहेत. वय व धर्म बदल करावयाच्या जाहिराती संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशने संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत अर्जदारांनी अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या अनुषंगाने राजपत्रात प्रसिध्द केल्या जातात.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात ऊर्जा संवर्धन धोरण राबविण्याबाबत

**(२०) ३११८० (१८-०८-२०१७). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात ऊर्जा बचत, संवर्धन आणि ऊर्जा क्षेत्रात तंत्रज्ञानाचा वापर या आधारे तयार करण्यात आलेल्या ऊर्जा संवर्धन धोरणास दिनांक ३० मे, २०१७

रोजी वा त्यासुमारास मा.मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली असून पाच वर्षात या धोरणाच्या अंमलबजावणीसाठी रुपये ८०७ कोटी ६३ लाख इतक्या निधीस मान्यता देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त धोरणाचे स्वरुप काय आहे व सदर धोरणाच्या अंमलबजावणीसाठी लागणारा निधी कशाप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे,
(३) असल्यास, उक्त धोरणाची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे व जनतेला त्याचा लाभ कशाप्रकारे मिळणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०१-०३-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे. राज्याचे ऊर्जा संवर्धन धोरण-२०१७ हे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २२ जून, २०१७ च्या शासन निर्णयानुसार जाहिर करण्यात आले आहे.

सदरचे धोरण राबविण्यासाठी पाच वर्षांमध्ये अंदाजित रुपये ८०७.६३ कोटी इतका खर्च अपेक्षित असून योजनानिहाय तरतूद करण्यात येणार आहे.
(२) व (३) ऊर्जा संवर्धन धोरण-२०१७ अंतर्गत ऊर्जा संवर्धन कायदा, २००१ ची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे व त्यासाठी राज्यात आवश्यक असलेल्या मूलभूत सुविधा निर्माण करणे, विविध क्षेत्रात सुमारे १००० मे वॅ एवढी ऊर्जा बचत साध्य करणे व याद्वारे कार्बन उत्सर्जन कमी करणे, वीज, ऑईल, गॅस यांच्या बचतीमुळे शासनावरील अनुदानाचा बोजा कमी करणे, ऊर्जा बचतीचे/ शासकीय इमारती/निमशासकीय संस्था/स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये ऊर्जा कार्यक्षमतेचे तंत्रज्ञान वापरास प्रोत्साहन देणे, एल.ई.डी. सारख्या तंत्रज्ञानाच्या वापरास मोठ्या प्रमाणावर प्रोत्साहन देणे, गावे, नगरपालिका/ महानगरपालिका यांच्या पथदिव्यात एल.ई.डी. चा वापर करणे, ऊर्जा बचतीचे/ कार्यक्षतेचे नवीन तंत्रज्ञान, एल.ई.डी. तंत्रज्ञानास मोठ्या प्रमाणावर प्रोत्साहन, उद्योग/इमारती क्षेत्रात ऊर्जा बचतीचे एस्को (ESCO) तत्वावर प्रकल्प राबविण्यासाठी मोठ्या प्रमाणावर प्रोत्साहन देणे, वीज निर्मिती प्रकल्प, पारेषण व वितरण यातील तांत्रिक हानी कमी करण्यासाठी विशेषण कार्यक्रम राबविणे, शालेय/महाविद्यालयीन/व्यावसायिक शाखांच्या अभ्यासक्रमामध्ये ऊर्जा संवर्धन व अपारंपारिक ऊर्जा या विषयांचा समावेश करणे अशा स्वरुपाच्या योजना राबविण्यात येणार आहेत.

अपारंपारिक ऊर्जा स्त्रोतांपासून निर्मित विजेमुळे स्वस्त व हरित प्रदुषणरहित ऊर्जा प्राप्त होणार असल्याने जनतेला व पुढच्या पिढीला स्वच्छ वातावरण मिळणार आहे.

सदर धोरणाच्या अंमलबजावणी शासन निर्णयाच्या दिनांकापासून सुरु असून त्याबाबतची कार्यपद्धती तयार करण्याचे काम प्रगती पथावर आहे. या धोरणांतर्गत राबविण्यात येणाऱ्या प्रत्येक योजनेसाठी स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात येणार आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे ऐनशेत (ता.वाडा, जि.पालघर) गावातील जॉबकार्ड धारकांना रोजगार हमी योजनेचे काम देण्याबाबत**

**(२१) ३१३९० (१८-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्रीमती हुस्नबानू खलिफे, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २९३२८ ला दिनांक ६ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे ऐनशेत (ता.वाडा, जि.पालघर) येथे रोशनी सावराच्या वडीलांना सन २०१६-१७ च्या आर्थिक सत्रातील माहे नोव्हेबर, डिसेंबर व जानेवारी या महिन्यात रोजगार हमीवर काम देण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) तसेच ऐनशेत गावातील रोजगार हमीवर जॉबकार्ड धारकांना उक्त महिन्यात काम देण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, एकूण किती मनुष्य दिवस, किती जॉबकार्ड धारकांना काम देऊन त्यांची किती मजुरी देण्यात आली,

(४) मोखाडा तालुक्यामध्ये काम मागितलेल्या जॉबकार्ड धारकांना १०० दिवसांऐवजी २०१५-१६ वर्षामध्ये ४७.३८ दिवस आणि २०१६-१७ वर्षामध्य ३६.६२ मनुष्य दिवस काम दिले, हे खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१३-०३-२०१८) :** (१) हे खरे नाही.

रोशनी सावरा यांच्या वडिलांना जॉबकार्ड प्रदान करण्यात आले आहे. परंतु त्यांनी महात्मा गांधी रोजगार हमी योजना महाराष्ट्र अंतर्गत कामाची मागणी केली नसल्याने त्यांना काम देण्यात आले नाही.

(२) हे खरे नाही.

वाडा तालुक्यातील ऐनशेत गावात एकूण १६० जॉबकार्ड धारक कुटुंब असून सदर जॉबकार्ड धारकांपैकी ४२ मजूरांना सन २०१६-१७ च्या नोव्हेंबर, डिसेंबर व जानेवारी महिन्यात रोजगार हमी योजनेचे काम उपलब्ध करुन देण्यात आले असून उर्वरीत ११८ मजुरांनी कामाची मागणी केलेली नाही.

(३) सन २०१६-१७ च्या नोव्हेंबर महिन्यात १४, डिसेंबर महिन्यात १५ व जानेवारी, २०१६ मध्ये १३ अशा एकूण ४२ जॉबकार्ड धारकांना रोजगार हमी योजनेचे काम देऊन रूपये ५२४५९ इतकी मजूरी देण्यात आली आहे.

(४) हे खरे नाही.

मोखाडा तालुक्यात सन २०१५-१६ या वर्षात एकूण २,४२,८६४/- मनुष्य दिवस निर्मिती व सन २०१६-१७ या वर्षात एकूण २,८४,२२३/- मनुष्य दिवस निर्मिती झालेली आहे. तसेच सन २०१७-१८ या वर्षात ९९,९९० इतकी मनुष्य दिवस निर्मिती झालेली आहे.

(५) व (६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## चुना कोळवण (ता.राजापूर, जि.रत्नागिरी) येथील स्थळाचा पर्यटन विकास योजनेंतर्गत विकास करण्याबाबत

**(२२) ३१३९४ (११-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चुना कोळवण (ता.राजापूर, जि.रत्नागिरी) मधील धबधब्याचा पर्यटनासाठी विकास करण्याची योजना राजापूर तालुकाच्या प्रांत अधिकारी यांनी शासनाला दिल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निर्दशनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पर्यटनाच्यादृष्टीने सदर योजना कार्यान्वित करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०९-०३-२०१८) :** (१) नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही. तथापि, ग्रामविकास विभागामार्फत कोकण ग्रामीण पर्यटन विकास योजनेंतर्गत सदर स्थळाच्या विकास कामांसाठी रुपये १.११ कोटी एवढा निधी मंजूर करण्यात आलेला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पोंभूर्ले, फणसगांव, विठ्ठलादेवी (जि.सिंधुदुर्ग) या ग्रामपंचायतीमध्ये रोजगार हमी योजनेंतर्गत केलेली कामे निकृष्ट दर्जाची झाल्याबाबत

**(२३) ३२३२९ (०८-०८-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पोंभूर्ले, फणसगांव, विठ्ठलादेवी (जि.सिंधुदुर्ग) या ग्रामपंचायतीमध्ये रोजगार हमी योजनेंतर्गत मंजूर झालेली कामे ही निकृष्ट दर्जाची असून निविदेत दर्शविलेल्या मानांकनाप्रमाणे झालेली नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने निकृष्ट दर्जाची कामे करणाऱ्या संबंधितांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१३-०३-२०१८) :** (१) हे खरे नाही.

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जिल्हा परिषद सिंधुदुर्ग अंतर्गत पंचायत समिती देवगड मध्ये सन २०११-१२ पासून कामांना सुरुवात करण्यात आली. ग्रामपंचायत पोंभूर्ले, फणसगांव, विठ्ठलादेवी

या गावामधील ६६ कामे पूर्ण झाली असून या संदर्भात आजपावेतो कोणत्याही मजुरांची किंवा लाभार्थ्यांची तक्रार प्राप्त झाली नाही.

ग्रामपंचायत पोंभूर्ले-१७, फणसगांव-२६ व विठ्ठलादेवी-२३ अशी एकूण ६६ कामे पूर्ण झाली आहेत. सदर कामांची चौकशी व पाहणी पंचायत समिती देवगड मधील तांत्रिक अधिकारी यांच्याकडून करण्यात आली असून कामांचे मुल्यमापन निविदेतील तपशीलाप्रमाणे असल्याचा अहवाल तांत्रिक अधिकारी यांनी दिला आहे.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील न्यायालये, आयोग व लवादांना पायाभूत सुविधा देण्याबाबत**

**(२४) ३२६२७ (११-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर, श्रीमती विद्‌या चव्हाण, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मा.मुंबई उच्च न्यायालयाने सर्व न्यायालये, आयोग व लवादांना आवश्यक सुविधा देण्याचे आदेश माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान शासनाला दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागरिकांना जलद न्याय मिळवून देण्याकरीता न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे राज्य शासनाची घटनात्मक जबाबदारी असल्याने निधी कमतरतेचे कारण देता येणार नाही, असेही सुचविले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या आदेशानुसार आतापर्यंत राज्यातील न्यायालये, आयोग व लवादांना कोणकोणत्या सुविधा देण्यात आल्या आहेत,

(४) असल्यास, याबाबतची सद्‌यःस्थिती काय आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२३-०४-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी जनहित याचिका क्र.१५६/२०११ प्रकरणी दिनांक ०५/०५/२०१७ रोजी राज्यातील न्यायालये, आयोग, लवाद यांना पायाभूत सुविधा देण्याचे निर्देश दिले आहेत.

(२) होय हे खरे आहे.

(३) व (४) मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार राज्यातील न्यायालये पायाभूत सुविधा, मनुष्यबळ इत्यादी सुविधा देण्यात आल्या असून वाढीव सुविधा देण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच विविध विभागांच्या नियंत्रणाखाली असलेल्या आयोग, लवाद यांना पायाभूत सुविधा देण्यात आल्या असून त्यांनाही वाढीव सुविधा देण्याबाबत कार्यवाही करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील कंत्राटी ग्रामसेवकांचा ३ वर्षे सेवाकाळ ग्राह्य धरणेबाबत

**(२५) ३४२८८ (१८-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामसेवकांना ३ वर्षे ग्रामसेवक म्हणून नियुक्त्या देण्यात आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास कृषी सेवक, शिक्षण सेवक यांचा हा कालावधी त्यांना मिळणाऱ्या सर्व लाभासाठी ग्राह्य धरण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्रामपंचायत स्तरावरील शासनाचा प्रतिनिधी म्हणून कार्यरत असणाऱ्या ग्रामसेवकांचा कंत्राटी पद्धतीतील ३ वर्षाचा सेवाकाळ हा सर्व सेवांसाठी ग्राह्य धरण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२६-०२-२०१८) :** (१) राज्यातील ग्रामसेवकांना ३ वर्ष कंत्राटी ग्रामसेवक म्हणून नियुक्त्या देण्यात आलेल्या आहेत.
(२) शिक्षक सेवकांनी व्यतित केलेला ३ वर्षाचा कंत्राटी कालावधी सर्व लाभांसाठी ग्राहय धरण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

कृषी सेवकांनी व्यतित केलेला ३ वर्षाचा कंत्राटी कालावधी अद्याप आश्वासित प्रगती योजनेसाठी ग्राहय धरण्यात आलेला नाही
(३) व (४) कंत्राटी ग्रामसेवकांनी ३ वर्षाचा व्यतित केलेला कंत्राटी कालावधी हा कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राहय धरण्यास मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव अंतिम मान्यतेसाठी मंत्रिमंडळासमोर ठेवण्यात येणार आहे.

---

## राज्यातील विशेषत: मुंबईतील माथाडी कामगार मंडळातील कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२६) ३४७९८ (०४-०१-२०१८). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील विशेषत: मुंबईतील विविध माथाडी कामगार मंडळातील कर्मचाऱ्यांची रिक्त पदे तसेच पूर्णवेळ चेअरमन, सचिव यांच्या नेमणुका न केल्याने माथाडी कामगारांची हजारो प्रकरणे न्यायाअभावी प्रलंबित असल्याचे तसेच माथाडी कायदयाची प्रभावीपणे अंमलबजावणी होत नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाने एक महिन्याच्या आत माथाडी मंडळावर पूर्णवेळ चेअरमन-सचिव आणि युनियनच्या कामगार नेत्यांच्या मंडळ सदस्य म्हणून नेमणुका न केल्यास तीव्र आंदोलन छेडण्याचा इशारा माथाडी नेत्यांनी दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२८-०३-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२), (३) व (४) सन्माननीय लोकप्रतिनिधी यांच्या दिनांक ०३/०१/२०१८ रोजीच्या निवेदनातील विविध मागण्याच्या अनुषंगाने मा.मंत्री (कामगार) यांचे अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली आहे.

माथाडी मंडळांवरील चेअरमन व सचिवांची रिक्त पदे भरण्यासाठी अतिरिक्त पदांना आकृतीबंधात मंजूरी प्राप्त करुन घेऊन त्यासाठी अनुक्रमे सहाय्यक कामगार आयुक्त व सरकारी कामगार अधिकारी ही पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरण्याबाबतची कार्यवाही विचाराधीन आहे.

त्याच प्रमाणे माथाडी मंडळामध्ये वर्ग-३ व वर्ग-४ ची रिक्त पदे भरण्याकरीता महाराष्ट्र माथाडी, हमाल आणि इतर श्रमजीवी कामगार (रोजगार नियमन व कल्याण) नियमावली, १९७० च्या नियमामध्ये सेवाप्रवेश नियम अंतर्भूत करण्याची कार्यवाही सुरु आहे. तसेच कामाचा निपटारा वेळेत होण्याकामी मंडळातील कर्मचाऱ्यांच्या रिक्त पदावर कंत्राटी पध्दतीने बाहययंत्रणेमार्फत कंत्राटी कर्मचारी नियुक्त करुन भरण्यात आलेले आहेत. याशिवाय, सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या रिक्त झालेल्या जागांवर माथाडी मंडळात निष्कलंक सेवा झालेल्या निवृत्त कर्मचारी /निरीक्षक यांना प्रतिनियुक्तीने नियुक्त करण्यासाठी कामगार आयुक्त यांना सूचना देण्यात आलेल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पांढरकवडा व राळेगाव (जि.यवतमाळ) तालुक्यात वाघाच्या हल्ल्यात शेतकरी व जनावरांचा मृत्यू झाल्याबाबत

**(२७) ३४८७४ (०२-०१-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पांढरकवडा, राळेगाव तालुक्यात (जि.यवतमाळ) वाघाच्या हल्ल्यात अनेक शेतकऱ्यांचा तसेच जनावरांचा मृत्यू झाल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सखी येथे वाघाच्या हल्ल्यात सतीश कोवे यांचा मृत्यू झाला तसेच, वाघाला पकडण्याचे प्रयत्न अयशस्वी झाले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने संबंधितांवार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०१-०३-२०१८) :** (१) माहे ऑक्टोंबर, २०१७ मध्ये पांढरकवडा वनविभागातील पांढरकवडा तालुक्यात दोन व राळेगाव तालुक्यात दोन या प्रमाणे चार व्यक्तींचा तर पांढरकवडा तालुक्यात ११ व राळेगाव तालुक्यात ७ अशा एकूण १८ जनावरांचा वाघाच्या हल्ल्यात मृत्यू झाला आहे
(२) व (३) श्री.सतिश पांडूरंग कोवे, रा. सखी यांचा दिनांक १६/०९/२०१७ रोजी वाघाच्या हल्यात मृत्यू झाला आहे.

मनुष्यहानी टाळण्याच्या अनुषंगाने मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांनी सदर वाघीणीस बेशुध्द करुन बंदिस्त करण्याची परवानगी दिली आहे.

त्या अनुषंगाने वनविभागामार्फत तज्ञाचे सहकार्याने सदर वाघीणीस बेशुध्द करुन बंदिस्त करण्याचे प्रयत्न सातत्याने सुरु आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील परवानाधारक कंत्राटदारांनी जीएसटी कराच्या निषेधार्थ जिल्हा परिषद बांधकामाच्या निविदा न भरण्याचा निर्णय घेतल्याबाबत

**(२८) ३४८९३ (०३-०१-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शहरी व ग्रामीण भागातील रस्ते, पुल, धरणे, इमारतीची बांधकामे करणाऱ्या सार्वजनिक बांधकाम विभागातील व जिल्हा परिषदेतील

कामे घेणाऱ्या परवानाधारक कंत्राटदारांनी केंद्र शासनाने दिनांक १ जुलै, २०१७ रोजीपासून लावलेल्या १८ टक्के जीएसटी कराच्या निषेधार्थ शासनाच्या व जिल्हापरिषदांच्या विविध बांधकामाच्या निविदा न भरण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परवानाधारक कंत्राटदारांच्या मागण्या काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-०३-२०१८)** : (१) दिनांक १ जुलै, २०१७ पासून अंमलात आलेल्या वस्तु व सेवा कर प्रणालीच्या अंमलबजावणीबाबत संभ्रम निर्माण होवून राज्यात काही विभागात कंत्राटदारांनी निविदा न भरण्याचा निर्णय घेतला होता, हे खरे आहे.
(२) दिनांक १ जुलै, २०१७ पूर्वीच्या निविदांबाबत वस्तु व सेवा करासंबंधातील रकमेचा परतावा मिळावा तसेच १ जुलै, २०१७ नंतरच्या निविंदामध्ये वस्तु व सेवा कराबाबतीत स्पष्टता असावी, ही कंत्राटदारांची मागणी होती.
(३) वस्तु व सेवा करासंबंधी करावयाच्या आवश्यक कार्यवाही बाबत शासनाचे धोरण स्पष्ट करण्यात आले असून त्याप्रमाणे सूचना क्षेत्रिय स्तरावरील अधिकाऱ्यांना निर्गमित करण्यात आल्या आहेत व त्यानुसार आता निविदांना प्रतिसाद मिळालेला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हयातील जलयुक्त शिवाराच्या कामांच्या चौकशीबाबत

**(२९) ३४९०२ (०२-०१-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३०८९६ ला दिनांक २८ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यात जलयुक्त शिवार योजनेंतर्गत गेल्या दोन वर्षात घेतलेल्या कामांपैकी अनेक कामे निकृष्ट दर्जाची होणे, बंधारा वाहून जाणे, त्यात पाणी न थांबणे, जागेची चुकीची निवड करणे, त्यामुळे शेतात पाणी शिरणे, पाणी भलतीकडेच थांबणे अशा त्रुटीमुळे शेतकऱ्यांचे मोठ्या प्रमाणात नुकसान झाले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करण्यासाठी नियुक्त केलेल्या समितीने अहवाल सादर केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, त्यानुसार उक्त प्रकरणी तसेच नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना अर्थिक मदत देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१२-०३-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विदर्भ ज्युनिअर कॉलेज टिचर्स संघटनेच्या मागण्यांबाबत**

**(३०) ३५०५७ (०२-०१-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विदर्भ ज्युनिअर कॉलेज टिचर्स असोसिएशनच्यावतीने नागपूर येथील संविधान चौकात शिक्षकांच्या विविध मागण्या त्वरीत निकाली काढण्याकरीता बुधवार, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास धरणे आंदोलन केले, हे खरे आहे काय,
(२) तसेच संघटनेच्यावतीने विविध मागण्यांचे निवेदन शिक्षणाधिकारी जिल्हा परिषद, नागपूर यांना देण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, त्यांच्या निवेदनात दिलेल्या सर्वसाधारण मागण्या कोणत्या आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संघटनेच्या मागण्या त्वरित निकाली काढण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०४-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) व (४) कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांच्या मागण्याबाबत झालेल्या बैठकीमध्ये काही मागण्या मान्य करण्यात आल्या असून उर्वरित मागण्यासाठी मा.वित्त मंत्री यांच्या समवेत बैठक घेऊन निर्णय घेण्याचे ठरले आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**हिंगोली जिल्ह्यातील जलयुक्त शिवार अभियानाबाबत**

**(३१) ३५११७ (०२-०१-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंगोली जिल्ह्यात जलयुक्त शिवार अभियानांतर्गत सन २०१६-१७ मध्ये किती गावे निवडण्यात आली आहेत,
(२) असल्यास, त्यापैकी किती गावांमध्ये कामे पूर्ण झाली आहेत व याकरीता किती खर्च करण्यात आला आहे ?

**प्रा. राम शिंदे (१२-०३-२०१८) :** (१) हिंगोली जिल्ह्यात जलयुक्त शिवार अभियान सन २०१६-१७ मध्ये १०० गावांची निवड करण्यात आली आहे.
(२) निवड केलेल्या १०० गावांपैकी ६३ गावातील १०० टक्के कामे पूर्ण व ३७ गावातील कामे ८० टक्के पेक्षा जास्त पूर्ण करण्यात आली असून कामांवर रुपये ४२.८७ कोटी खर्च करण्यात आला आहे.

---

**हिंगोली जिल्ह्यातील म्हाडा अंतर्गत गृहनिर्माण योजनेच्या कामांबाबत**

**(३२) ३५१४८ (०४-०१-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्ह्यात म्हाडा अंतर्गत किती गृहनिर्माण योजनेची कामे गेल्या ५ वर्षात झाली आहेत,

(२) असल्यास, किती योजनेची कामे अपूर्ण आहेत,

(३) असल्यास, कामे अपूर्ण राहण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०३-०४-२०१८) :** (१) औरंगाबाद गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळामार्फत गेल्या ५ वर्षात हिंगोली येथील स.क्र.१४३ (भाग) येथे ८० गाळे अल्प उत्पन्न गट, ४२ गाळे मध्यम उत्पन्न गट, १३ दुकाने व २ सुविधा हॉल या योजनेचे काम पूर्ण करण्यात आले आहे.

(२) सद्य:स्थितीत कोणत्याही योजनेचे काम अपूर्ण नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**पुणे शहरातील उड्डाणपुल, पुल तसेच भुयारी मार्गाच्या दुरुस्तीबाबत**

**(३३) ३५२६० (०४-०१-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरातील उड्डाणपुल, पुल तसेच भुयारी मार्गाची दुरुस्ती व देखभाल करण्याबाबत महापालिकेचा पथ आणि वाहतूक नियोजन (प्रकल्प) विभागाकडून चालढकल सुरु असल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार पुणे शहरातील उड्डाणपुल, पुल तसेच भुयारी मार्गाच्या देखभाल दुरुस्तीची जबाबदारी ठरविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०४-२०१८) :** (१), (२) व (३) पुणे महानगरपालिका हद्दीतील एकूण ४९ पूल, उड्डाणपूलांपैकी २५ वर्षापेक्षा जास्त जुन्या १८ पूलांचे स्ट्रक्चरल ऑडिट करणेत आले आहे. त्याचा अहवाल त्यांनी पुणे महानगरपालिकेस सादर केला. स्ट्रक्चरल ऑडिट तज्ञ सल्लागार मे. सी.व्ही. कांड यांची नेमणूक करुन केलेल्या पूलांपैकी ७ पूलांचे दुरुस्तीचे काम पूर्ण करणेत आलेले आहे.

तज्ञ सल्लागार यांचे सल्लानुसार विविध दुरुस्तीचे काम करणेत आली आहेत.

पुणे महानगरपालिकेने पादचारी सुरक्षा व सुविधा धोरण-पुणे शहर तयार केले असून या धोरणानुसार पादचारी पूल व भुयारी मार्ग यांचा जास्तीत जास्त वापर होणेसाठी पुणे महानगरपालिकेमार्फत आयुक्त कार्यालयाकडील दिनांक २०/३/२०१७ अन्वये संबंधित क्षेत्रिय कार्यालयाकडे भुयारी मार्ग व पादचारी उड्डाणपूल यांची देखभाल दुरुस्तीची कामे सोपविण्यात आलेली आहेत. संबंधित क्षेत्रिय कार्यालयाकडून आवश्यकतेनुसार व उपलब्ध तरतूदीनुसार भुयारी मार्ग व पादचारी उड्डाणपूलांच्या देखभाल दुरुस्तीची कामे करणेत येत आहेत. यामध्ये स्वच्छता, पुरेशी प्रकाश व्यवस्था, सुरक्षा, सी.सी.टी.व्ही. कॅमेरे बसविणे इ. कामांचा समावेश आहे. या कामांसाठी पुणे महानगरपालिकेच्या अंदाजपत्रकात पुरेशी तरतूद उपलब्ध करुन घेण्यात येत आहे.

---

## पोलीस कर्मचाऱ्याच्या अभियंता मुलीचे अपहरण करून हत्या झाल्याच्या घटनेबाबत

**(३४) ३५३३३ (०२-०१-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई येथे नोकरी करणाऱ्या नागपूरच्या एका पोलीस कर्मचाऱ्याच्या अभियंता मुलीचे अपहरण करून हत्या झाल्याची घटना दिनांक ६ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणाची चौकशी करून दोषीवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०४-२०१८) :** (१) मुंबई येथे नोकरी करणाऱ्या नागपूरच्या एका पोलीस कर्मचाऱ्याच्या अभियंता मुलीचे अपहरण झालेले नाही. तथापि मुळ राहणार, बॅन्ड लाईन, टाकळी, नागपूर (सध्या नवी मुंबई येथे खाजगी कंपनीमध्ये नोकरी करणाऱ्या) येथील एका मुलीवर बलात्कार करुन तिचा खून केल्याची घटना दिनांक ६ सप्टेंबर, २०१७ रोजी निदर्शनास आलेली आहे.
(२) सदर प्रकरणी रत्नागिरी शहर पोलीस ठाण्यात प्रथम तक्रार दिनांक ०६/०९/२०१७ रोजी तक्रार नोंद क्र.००/२०१७ प्रमाणे दाखल करण्यात आली. तद्नंतर सदरचा गुन्हा शिवाजीनगर पोलीस ठाणे, अंबरनाथ (पूर्व) जि.ठाणे यांचे हद्दीत घडलेला असल्यामुळे सदर गुन्हा शिवाजीनगर पोलीस ठाण्यात वर्ग करुन शिवाजीनगर पोलीस ठाणे येथे तीन आरोपींविरुध्द गु. र.नं. २३६/२०१७ भादंवि कलम ३७६(२)(ग), ३०२, २०१, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करुन सदर गुन्ह्यातील तीनही आरोपींना अटक करुन त्यांच्याविरुध्द मा.न्याय दंडाधिकारी, प्रथम वर्ग, तिसरे सह दिवाणी न्यायालय, उल्हासनगर येथे आरोपींविरुध्द दोषारोप पत्र दाखल करण्यात आले असून सद्य:स्थितीत गुन्हा न्याय प्रविष्ठ आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सेवायोजन कार्यालयात नोंदणी केलेल्या उमेदवारांना नोकरीची संधी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(३५) ३५८७५ (०४-०१-२०१८). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वाढत्या बेरोजगारीच्या पार्श्वभुमीवर शासकीय रोजगार विनियम केंद्राच्या माध्यमातून तरी आपल्याला नोकरी मिळेल या आशेने लाखो तरुण या केंद्रामध्ये नोकरीसाठी नाव नोंदणी करीत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील या सेवायोजन कार्यालयातून एक टक्काही उमेदवारांना नोकरी मिळत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या सेवायोजन कार्यालयातून अधिकाधिक तरुणांना नोकऱ्या उपलब्ध व्हाव्यात यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१३-०४-२०१८) :** (१) होय.
(२) नाही. सरासरी ३.५० % उमेदवारांना नोकरी उपलब्ध होत आहे.
(३) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेंतर्गत नाव नोंदणी केलेल्या उमेदवारांना रोजगार व स्वयंरोजगार सहाय्यार्थ, १) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्राचे संगणकीकरण, २) बेरोजगार उमेदवारांसाठी ग्रंथालय सदृष्य अभ्यासिका निर्माण करणे,३) रोजगार मेळावे आयोजित करणे, ४) बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था स्थापन करणे, ५) आदिवासी उमेदवारांसाठी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, माहिती व मार्गदर्शन प्रशिक्षण केंद्र, ६) रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम, ७) राज्यात व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र स्थापन करणे, ८) प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान अशा प्रकारच्या योजना राबविण्यात येतात.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील न्यायालयांना आवश्यक अधिकारी/कर्मचारी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(३६) ३५९२१ (०४-०१-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ : तारांकित प्रश्न क्रमांक २७०५७ ला दिनांक २९ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मा.मुंबई उच्च न्यायालय व कनिष्ठ न्यायालयात प्रलंबित खटल्यांची संख्या वेगाने वाढत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रलंबित खटल्यांची जलदगतीने निपटारा करण्यासाठी राज्यातील न्यायालयांना आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०३-२०१८)** : (१) प्रलंबित खटल्यांच्या संख्येत वर्षनिहाय वाढ होत आहे.
(२) राज्यातील प्रलंबित खटल्यांचा निपटारा करण्याच्या अनुषंगाने मा.न्यायमुर्तींच्या वैयक्तिक युनिट स्टाफमधील अधिकारी/कर्मचारी यांची एकूण ३४८ पदे, कोर्ट मॅनेजरची कायमस्वरूपी ४५ पदे, उच्च न्यायालयाच्या विविध संवर्गातील १७१ पदे, ८६ सहाय्यभूत पदे, तांत्रिक कामाकरीता तांत्रिक संवर्गातील ११ नियमित स्वरूपातील व २६ बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची पदे, मा.न्यायमुर्तींना त्यांच्या न्यायालयीन कामकाजात सहाय्यभूत ठरतील अशी प्रति न्यायमुर्ती एक विधि लिपीक ही पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे.

तसेच राज्यातील कनिष्ठ न्यायालयातील न्यायाधीशांची १७९ व अनुषंगिक अधिकारी/ कर्मचारी यांची ७५१ पदे देखील निर्माण करण्यास शासन निर्णय, दिनांक ०६/०१/२०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच कनिष्ठ न्यायालयांतील ११६२ पदे नव्याने निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन आहे.

तसेच राज्यात स्थापन करण्यात आलेल्या १०० जलदगती न्यायालयांना दिनांक ३१/०३/२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. १४ व्या वित्त आयोगाअंतर्गत राज्यात एकूण १४ कौटुंबिक न्यायालये तसेच दिनांक १८/०८/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये ५ वर्षांकरीता २४ जलदगती न्यायालये, १८ अतिरिक्त न्यायालये स्थापन करण्यात आली असून सदर न्यायालयांकरीता पदनिर्मितीही करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नाशिक जिल्ह्यातील अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत लासलगाव, देवगाव (ता.निफाड) व अंदरसुल (ता.येवला) येथील महिलांच्या सक्षमीकरणाबाबत**

**(३७) ३६१०४ (०२-०१-२०१८). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक जिल्ह्यात अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या वैशिष्ट्यपूर्ण/नाविन्यपूर्ण योजनेतून आमदार आदर्श ग्राम योजनेसाठी निवड करण्यात आलेल्या लासलगाव, देवगाव (ता.निफाड) व अंदरसुल (ता.येवला) या गावातील महिलांचे सक्षमीकरण करण्यासाठी दुधाळ गाईचा पुरवठा करणे हा पथदर्शी प्रकल्प राबविण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी जिल्हा प्रशासन व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक यांचेकडे दिनांक ४ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०६-०३-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर प्रकल्पाच्या वैधते संदर्भात महिला व बालविकास अधिकारी आणि जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद यांना दिनांक ०६/०१/२०१८ च्या पत्रान्वये वैधता तपासणीकरीता कळविण्यात आले आहे. तसेच वैध प्रकल्पाचा प्रस्ताव तात्काळ पाठविणेबाबत सूचित केले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**येवला व नांदगाव (जि.नाशिक) तालुक्यातील उपकेंद्राच्या क्षमतेत वाढ करण्याबाबत**

**(३८) ३६२४० (०२-०१-२०१८). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) येवला व नांदगाव (जि.नाशिक) तालुक्यातील विद्युत पुरवठा सुरळीत करण्यासाठी मनमाड अतिउच्च दाब उपकेंद्राच्या क्षमतेत वाढ करून ते २२० केव्ही क्षमतेचे करण्याची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक ७ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे केलेली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त मागणीच्या अनुषंगाने शासनामार्फत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-०३-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) महापारेषण कंपनीच्या १३२ के.व्ही. मनमाड उपकेंद्राची श्रेणीवाढ (Upgradation) करुन सदर ठिकाणी २२० के.व्ही. उपकेंद्र उभारणीसाठीच्या प्रस्तावास महापारेषण कंपनीतर्फे ठराव क्र. १२४/१२, दिनांक २६/१२/२०१७ अन्वये मंजुरी देण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात कडधान्यांची हमी भावाने खरेदी करण्याबाबत**

**(३९) ३६३५० (०२-०१-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.सुनिल तटकरे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात कडधान्यांची हमी भावाने खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनामार्फत कोणता निर्णय घेण्यात आला आहे, सदर निर्णयानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०९-०३-२०१८) :** (१) व (२) सन २०१७-२०१८ मध्ये राज्यात किमान आधारभूत दराने तेलबिया व कडधान्याची खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव दिनांक १३ सप्टेबर, २०१७ रोजी केंद्र शासनास सादर करण्यात आला होता.केंद्र शासनाने मुग, उडीद व सोयाबीनची नाफेडमार्फत खरेदी करण्यास दिनांक २७/०९/२०१७ व दिनांक ३/१०/२०१७ च्या पत्रान्वये मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार मुग,उडीद सोयाबीनची खरेदीचा कालावधी, एकूण खरेदी पुढीलप्रमाणे आहे :-

| पिक | खरेदीचा कालावधी | एकूण खरेदी (क्विंटलमध्ये) | लाभार्थी शेतकरी |
|---|---|---|---|
| मुग | दिनांक १३/१०/१७ ते १२/०१/१८ | ५४,३४१.५० | ११,२८८ |
| उडीद | दिनांक १३/१०/१७ ते २०/०१/१८ | ५,८६,६३९.४८ | ८०,६५४ |
| सोयाबीन | दिनांक १५/१०/१७ ते १२/०१/१८ | २,६२,८३८.४६ | १८,३०९ |

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोला महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्यांच्या संप काळातील वेतन वाटपाबाबत

**(४०) ३६४४३ (०४-०१-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला महानगरपालिका कर्मचाऱ्यांचे दिनांक २५ मे, २०१६ ते दिनांक ०७ जून, २०१६ पर्यंत एकूण १४ दिवसांचे संप काळातील कपात केलेले वेतनाबाबतची तक्रार स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात आयुक्त, महानगरपालिका अकोला यांना निर्देशित करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शासनस्तरावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०४-२०१८) :** (१) असे निवेदन शासनस्तरावर प्राप्त झालेले नाही. तथापि, याबाबत अकोला महानगरपालिकेकडे निवेदन प्राप्त झाले आहे.

(२) नाही.

(३) व (४) दिनांक २५/०५/२०१६ ते ०७/०६/२०१६ या कालावधीत अकोला महानगरपालिका कर्मचारी संघर्ष समितीने केलेला संप मागे घेण्याबाबत त्यांना वारंवार पत्र देवून आणि विनंती करुनही संप मागे नसल्याने, शासनाच्या तसेच मा.सर्वोच्च न्यायालयाने विविध प्रकरणात दिलेल्या निर्णयाच्या पार्श्वभूमीवर “काम नाही वेतन नाही” या तत्वानुसार या कालावधीतील अकोला महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्यांचे वेतन कपात करण्यात आलेले आहे.

---

**राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, अकोला येथील कंत्राटी कर्मचाऱ्यांना रिक्त पदावर समायोजन करणेबाबत**

**(४१) ३६४४४ (०२-०१-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, अधिकारी व कर्मचारी महासंघ, महाराष्ट्र राज्य शाखा, अकोला येथील कंत्राटी कर्मचाऱ्यांना रिक्त पदावर समायोजन करणेबाबत आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास समिती गठित करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त समितीने आपला अहवाल शासनास सादर केला आहे काय,

(३) असल्यास, उक्त अहवालानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०९-०३-२०१८) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे. राज्यातील राष्ट्रीय आरोग्य अभियान योजनेंतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचाऱ्यांचे नियमित स्वरुपात समावेश कशा प्रकारे करण्यात यावा, याचा अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्यात आली आहे.

(२) समितीचा अहवाल शासनास अदयाप प्राप्त झालेला नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे, कोल्हापूर व यवतमाळ येथील दहा पर्यटन स्थळांचा विकास करण्याबाबत

**(४२) ३६५१७ (०२-०१-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे, कोल्हापूर व यवतमाळ येथील दहा पर्यटन स्थळांचा विकास करण्याचा निर्णय शासनाने माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानुसार शासनाने किती निधीची तरतूद केली आहे,

(३) तसेच सदर पर्यटन स्थळाचा विकास किती कालावधीत करण्यात येणार आहे ?

**श्री.जयकुमार रावल (१२-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सिना-कोळेगांव (ता.परांडा, जि.उस्मानाबाद) प्रकल्पाबाबत

**(४३) ३६५२३ (०२-०१-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिना-कोळेगांव (ता.परांडा, जि.उस्मानाबाद) प्रकल्पात सन २००८ सालापासून पाणी साठा करण्यात येत असून ८० टक्के कॅनॉलची कामे पूर्ण झालेली असून पंपींग स्टेशन व मशिनरी दुरुस्तीचे काम पूर्ण झाले नसल्यामुळे लाभार्थी शेतकऱ्यांना या योजनेचा लाभ मिळत नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर योजना सुरु करण्याकरीता लोकप्रतिनिधींनी दिनांक १८ जानेवारी, २०१७ रोजी शासनाकडे निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०८-०३-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) होय.

(३) परांडा बाजूकडील उपसा सिंचन योजना जानेवारी, २०१४ मध्ये सिंचनासाठी कार्यान्वित करण्यात आली आहे. सदर योजनेच्या रोहीत्र दुरुस्तीची कामे पूर्ण होऊ शकली नाहीत. तसेच कामाची निविदा कार्यवाही जिल्हा परिषद निवडणुक आदर्श आचार संहिता २०१७ लागू झाल्यामुळे कामाची निविदा प्रसिध्द करता आली नाही. कार्यकारी अभियंता, जलविदयुत विभाग, इंदापुर यांचे मार्फत निविदा कार्यवाही हाती घेऊन दुरुस्तीचे काम एप्रिल, २०१८ अखेर पूर्ण करण्याचे नियोजन आहे. दरम्यान, शिराळा उपसा सिंचन योजनेवरील एक रोहीत्र परांडा उपसा सिंचन योजनेला तात्पुरत्या स्वरुपात बसवून योजना कार्यान्वित करण्यात आलेली आहे व मागणीनुसार अनाळा ल.पा. तलावात १२५.३९ द.ल.घ. फू. पाणीसाठा करणेत आला आहे.

करमाळा बाजूकडील उपसा सिंचन योजना सिंचनासाठी दिनांक ०६/०१/२०१७ रोजी कार्यान्वित केलेली असून एका पंपाव्दारे दिनांक २१/१०/२०१७ ते १४/११/२०१७ या कालावधीत मागणीनुसार नेरले ल.पा. तलावात २३.५४ द.ल.घ.फू. पाणी सोडण्यात आले आहे. उर्वरित दोन पंपाची दुरुस्ती करणेची कामे कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग क्र. १, दापोडी यांचेमार्फत प्रगतीपथावर आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

___________

## राज्य परिवहन महामंडळातील कर्मचाऱ्यांनी वेतनवाढीसाठी केलेल्या संपाबाबत

**(४४) ३६७८२ (०३-०१-२०१८). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील राज्य परिवहन महामंडळातील कर्मचाऱ्यांनी वेतनवाढीसाठी केलेल्या संपामुळे सदर कर्मचाऱ्यांवर कारवाई करण्याचे आदेश सर्व विभागांना पाठविण्यात आल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कर्मचाऱ्यांवर कारवाई झाल्यास, त्यांची आर्थिक परिस्थिती अधिक बिकट होणार असल्यामुळे त्यावर सोम्य स्वरूपाची कारवाई व्हावी, याबाबत शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०६-०३-२०१८) :** (१) व (२) राज्य परिवहन महामंडळातील कर्मचाऱ्यांनी केलेल्या संपाबाबत दिनांक २९/०१/२००५ रोजीच्या संचालक मंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार महामंडळाच्या दिनांक ३०/१०/२०१७ रोजीच्या पत्रान्वये ३६ दिवसांचे वेतन कपात करण्याचा निर्णय घेण्यात आला होता, सदरच्या निर्णयास महामंडळाच्या दिनांक ०१/११/२०१७ च्या पत्रान्वये स्थगिती देण्यात आली व जे कर्मचारी दिनांक १७/१०/२०१७ ते दिनांक २०/१०/२०१७ या कालावधीत संपात सहभागी असतील त्यांचे ४ दिवसांसाठी "ना काम ना दाम" या तत्वाप्रमाणे दर महिन्याला १ दिवस या प्रमाणे ४ दिवसांचे वेतन कपात करण्यात येईल किंवा कामगारांनी प्रत्येक दिवसासाठी २ दिवस याप्रमाणे ८ दिवसांची सरासरी वेतन रजा समर्पित केल्यास वेतन कपात करण्यात येणार नाही, अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जळगाव जिल्हा पोलीस अधिक्षक कार्यालयात महिला पोलीस कर्मचाऱ्याची छेड काढल्याबाबत

**(४५) ३६८२४ (०४-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जळगाव जिल्हा पोलीस अधिक्षक कार्यालयात मद्यधुंद निलंबित पोलीस कर्मचाऱ्याने महिला पोलीस कर्मचाऱ्याची छेड काढल्याचा प्रकार निदर्शनास आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तक्रार करूनही दोषी कर्मचाऱ्यावर कारवाई करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून दोषी कर्मचाऱ्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-०४-२०१८) :** (१) खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) सदरची घटना कार्यालयात घडलेली नसून पोलीस मुख्यालय आवारात घडली आहे. पिडीत महिला पोलीस कर्मचारी यांनी घटकातील जिल्हापेठ पोलीस स्टेशनात दिलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करण्यात आली असून मद्यधुंद पोलीस कर्मचारी हे दोषी आढळून आल्याने त्यांना दिनांक २१/११/२०१७ रोजी निलंबित करण्यात आले आहे. तसेच खातेनिहाय विभागीय चौकशीचे आदेश देण्यात आले असून सद्य:स्थितीत चौकशी सुरु आहे.

(४) विलंब झालेला नाही.

---

## कुक्कुटपालन व्यवसायामार्फत होणाऱ्या प्रदूषणावर नियंत्रण ठेवण्याबाबत

**(४६) ३६८५१ (०२-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कुक्कुटपालन फार्म, अंडी उगवणी केंद्र आणि चिकन सेंटर इत्यादी कारणामुळे होणारे प्रदूषण कमी करण्यासाठी महाराष्ट्र राज्य प्रदूषण नियंत्रण मंडळाची परवानगी घेणे आवश्यक असल्याबाबतचा निर्णय हरित प्राधिकरणामार्फत घेण्यात आल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महाराष्ट्र राज्य प्रदूषण नियंत्रण मंडळ, उपप्रादेशिक कार्यालय, जळगांव यांच्यामार्फत आतापर्यंत किती परवाने देण्यात आली आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन परवाने नसलेल्या विना-परवाना व्यावसायिकांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रामदास कदम (०३-०३-२०१८) :** (१) महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाकडून दिनांक २९/०७/२००९ च्या परिपत्रकानुसार मटण, मांस, चिकन विक्रेत्यांना स्थानिक स्वराज्य संस्था यांनी शॉप अॅण्ड एस्टॅब्लिशमेंट अॅक्टनुसार महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषद याचे ना हरकत प्रमाणपत्र तसेच कुक्कुटपालन फार्मला संमतीपत्र घेणे बंधनकारक करण्यात आलेले आहे. त्याचप्रमाणे केंद्रीय प्रदुषण नियंत्रण मंडळाने माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये सुधारीत उद्योग प्रवर्गानुसार कुक्कुटपालन फार्म व अंडी उबवणी केंद्र या उद्योगास हरित प्रवर्गामध्ये संमतीपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक केले आहे.
(२) महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाकडून उपप्रादेशिक कार्यालय, जळगांव या कार्यालयामार्फत एकूण २२ पोल्ट्री फॉर्म धारकांना संमतीपत्रे देण्यात आलेली आहेत.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**औषध नियंत्रण प्रयोगशाळा औषध प्रशासनाच्या प्रभावाखाली असल्याबाबत**

**(४७) ३६८६९ (०२-०१-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औषध नियंत्रण प्रयोगशाळेचा कार्यभार हा अन्न व औषध प्रशासनाच्या प्रभावाखाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.न्या. लॅटीन आयोगाच्या शिफारशीनुसार व सहाय्यक संचालक पदाच्या सेवाशर्तीनुसार प्रयोगशाळेचा कार्यभार हा पदव्युत्तर व शासकीय विश्लेषक असलेल्या व्यक्तीकडेच असावा असे नमूद करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणाबाबत प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांना लोकप्रतिनिधींनी दिनांक १२ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास पत्राद्वारे कळविले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (२३-०३-२०१८) :** (१) औषध नियंत्रण प्रयोगशाळेचा कार्यभार हा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांच्या अधिपत्याखाली आहे.

(२) हे खरे नाही.

(३) हे खरे आहे.

(४) सद्य:स्थितीत सहायक संचालक, अन्न व औषध प्रशासन प्रयोगशाळा, मुंबई या पदाचा कार्यभार वरीष्ठ वैज्ञानिक अधिकारी, अन्न व औषध प्रशासन प्रयोगशाळा, मुंबई यांचेकडे देण्यात आला आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी जिल्ह्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेतील समित्या गठीत करण्याबाबत

**(४८) ३६९४१ (०२-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जीवनावश्यक वस्तुवर देखरेख करण्यासाठी ग्राम, तालुका, जिल्हा, नगरपालिका, महानगरपालिका तसेच जिल्हास्तरीय दक्षता समित्या गठीत करुन बैठका घेण्याबाबत अन्न व नागरी पुरवठा विभागाने दिनांक २८ मार्च, २०१२ रोजी शासन परिपत्रक जारी केले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासन आदेश असतांनाही परभणी जिल्हयात वरील सर्व ठिकाणी दक्षता समित्यांचे गठन करणे तसेच, नियमित बैठका घेणे याबाबत प्रशासकीय स्तरावरुन जाणीवपूर्वक दुर्लक्ष करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर समित्यांचे गठन व बैठकाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०५-०३-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२), (३) व (४) सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत वितरीत करण्यात येणाऱ्या जीवनावश्यक वस्तूंच्या वितरणावर देखरेख ठेवण्यासाठी शासन निर्णय दिनांक २३/०१/२००८ अन्वये राज्यात विविध स्तरावर गठीत करण्यात आलेल्या दक्षता समित्यांच्या बैठका दरमहा नियमितपणे घेण्याबाबत वेळोवेळी शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार जानेवारी, २०१७ ते डिसेंबर, २०१७ या कालावधीत परभणी जिल्हयात ग्रामस्तरावर ७०४ दक्षता समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. दक्षता समितीवरील अशासकिय सदस्यांच्या नियुक्तीबाबत मा.पालकमंत्री महोदयांकडून प्राप्त शिफारशीनुसार पालम, पूर्णा व परभणी या तालुक्यांच्या दक्षता समितीवर अशासकिय सदस्यांची नियुक्ती करण्यात आली असून उर्वरित दक्षता समितीवरील अशासकिय सदस्यांच्या नियुक्तीबाबत कार्यवाही करण्यात येत आहे.

ग्रामस्तरीय दक्षता समितीच्या एकूण ८३०८, तालुकास्तरीय दक्षता समितीच्या ८८, जिल्हास्तरीय दक्षता समितीच्या एकूण ९, नगरपालिकास्तरीय दक्षता समितीच्या एकूण ७१ व महानगरपालिकास्तरीय दक्षता समितीच्या एकूण ६ बैठका घेण्यात आलेल्या आहेत.

---

## परभणी येथील ईदगाह मैदानाचे संरक्षण करण्याबाबत

**(४९) ३६९४३ (०२-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **वक्फ मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ईदगाह मैदान (परभणी) सर्वे नं. ६३६ येथील बेकायदेशीररित्या अतिक्रमण निष्कासित करण्याबाबत मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद यांनी सन २०१३ मध्ये वा त्यादरम्यान आदेश काढलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अतिक्रमण निष्कासित करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, वक्फ मंडळ औरंगाबाद यांनी आयुक्त, महानगरपालिका परभणी यांना अतिक्रमण निष्कासित करण्याबाबतचे पत्र माहे जुलै, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान दिले, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पवित्र ईदगाह मैदानावरील अतिक्रमण हटवून सदरील जागा वक्फ मंडळाच्या ताब्यात घेण्यासोबतच जागेच्या संरक्षणाबाबत कोणतीकार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच याबाबत थोडक्यात माहिती काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१८-०४-२०१८)** : (१) अंशत: खरे आहे. सदर मालमत्तेप्रकरणी महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी एकूण १३ अतिक्रमणकर्त्यांविरुध्द निषेधाज्ञा (order of injunction) काढली होती. त्यांविरुध्द संबंधितानी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे CRA No.९९/२०१२ दाखल केला होता.त्यास अनुसरुन मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०९/१२/२०१५ च्या आदेशान्वये वक्फ न्यायाधिकरणाचे आदेश कायम केले आहेत.

(२) होय.

(३) सदर प्रकरणी न्यायालयीन निर्णयानुसार कार्यवाही सुरु असल्याने शासनस्तरावरुन वेगळयाने चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

___________

## परभणी जिल्ह्यातील देवस्थान व वक्फ संस्थांच्या मालमत्ता पुर्ववत करण्याबाबत

**(५०) ३६९४४ (०२-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **वक्फ मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी जिल्ह्यातील सर्व धर्माच्या देवस्थान इनामी जमिनी तसेच वक्फ बोर्डाच्या जमिनी यांचे झालेले बेकायदेशीर हस्तांतरण रद्द करुन त्या पूर्ववत देवस्थाने व वक्फ बोर्डाच्या नावे करण्यात याव्यात असे आदेश जिल्हाधिकारी, परभणी यांनी दिनांक ०९ जून, २०१४ रोजी काढले होते, हे खरे आहे काय,

(२) तसेच, महसूल विभागाने याच प्रकरणी दिनांक ३० जुलै, २०१० रोजी शासन परिपत्रकही काढले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वरील दोन्ही आदेशाप्रमाणे परभणी जिल्ह्यातील सर्व ईनामी जमिनी व वक्फ मालमत्ता पुर्ववत देवस्थानाच्या व वक्फ बोर्डाच्या नावे करण्यात आल्या असल्यास, याबाबत तालुकानिहाय माहिती काय आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तदनुसार संबंधित अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१८-०४-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

(३) परभणी जिल्ह्यातील सर्व वक्फ मालमत्तांवर वक्फ मंडळाचे नांव नोंदविणे व “वक्फ प्रतिबंधित सत्ता प्रकार” अशी नोंद घेण्याबाबत कार्यवाही करण्यात येत असून जिल्ह्यातील ३१९ वक्फ मालमत्तापैकी परभणी तालुक्यातील २९, मानवत १२, पालम ५४, सोनपेठ ३१, सेलू ८, पुर्णा १ अशा एकूण १३५ वक्फ मालमत्तेची ७/१२ वर नोंद घेण्यात आली आहे.

उर्वरित १८४ वक्फ मालमत्ताच्या प्रकरणात तक्रारी/ न्यायप्रविष्ठ असल्याने ७/१२ वर नोंद घेता आली नाही. प्रस्तुत प्रकरणी न्यायालयीन निर्णयाच्या अधिन राहून आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण : शासकीय मुद्रणालय, नागपूर